सन २०२२-२०२३ करिता राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणांतर्गत लेखाशीर्ष २०७००८८२, बाब २८- व्यावसायीक सेवा याअंतर्गत पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं - ०५२२/ प्र.क्र.२०२/१३-स**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- १६ फेब्रुवारी,२०२३

**वाचा :-** १.राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे, क्रमांक:- जा.क्र. रासनिप्रा / निवडणूक/ लेखा/ कक्ष-१५/ पुरवणी मागणी /डिसे.२२/७८७२/२०२२, दिनांक ०३ नोव्हेंबर, २०२२ रोजीचे पत्र.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: पूरक -२०२२/ प्र.क्र.९६/अर्थ-३, दिनांक २३ डिसेंबर,२०२२.

३. सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक: पुरक -१९२२/ प्र.क्र. (११२/२०२२)/१७स, दिनांक ३० डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे वाचा १ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने व्यावसायीक सेवा याबाबीखाली वकिल फीची रक्कम अदा करण्यासाठी हिवाळी अधिवेशन डिसेंबर, २०२२ च्या पुरवणी मागणीद्वारे बाब २८- व्यावसायीक सेवा याबाबीसाठी रुपये १६,०६,०००/- (अक्षरी रुपये सोळा लाख सहा हजार फक्त) इतक्या रकमेचा पुरक मागणीचा प्रस्ताव विधानमंडळास सादर करण्यात आला होता. विधिमंडळाने मान्यता दिल्याप्रमाणे पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयासाठी डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात मागणी क्र.व्ही-२, २०७०- इतर प्रशासनीक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(००)(०१), राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, (२०७० ०८८२)- २८- व्यावसायीक सेवा करिता रुपये १६,०६,०००/- इतक्या निधीची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे.

२. उपरोक्त मंजूर पुरवणी मागणीचा तपशील विचारात घेता बाब २८-व्यावसायीक सेवा अंतर्गत पुरवणी मागणीद्वारे मंजूर रुपये १६,०६,०००/- (अक्षरी रुपये सोळा लक्ष सहा हजार फक्त) इतका निधी वितरणास या शासन निर्णयान्वये मान्यता दर्शविण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला रुपये १६,०६,०००/- (अक्षरी रुपये सोळा लक्ष सहा हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यासाठी सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी (V0004) म्हणून व सह सहकारी निवडणुक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. निवडणूक प्राधिकरणांतर्गत कंत्राटी सेवा व व्यावसायीक सेवा याबाबींकरीता वितरीत करण्यात येणारी रक्कम निवडणूक प्राधिकरण, २०७० ०८८२ अंतर्गत बाब २८- व्यावसायीक सेवा या लेखाशिर्षाखाली खर्ची पडेल.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीत संदर्भ क्रमांक ५३/२०२३/व्यय-२,दिनांक ३०.०१.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२१७१०४१२२३७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.02.17 10:47:49 +05'30'

**(अनिल ज.चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/ पुणे.
६. अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव, व्यय-२ / अर्थ-१३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत :-**

१. मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२. निवडनस्ती १३-स.